वरिष्ठ लिपिक पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करणेबाबत...
श्रीमती ए.ए.श्रीगिरीवार, सेवानिवृत्त कनिष्ठ लिपीक

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सकआ २०१९/ प्र.क्र. ७३/आस्था २**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १९.१०.२०२०.

**वाचा:-** १) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे दि.१२.९.१८ व दि.२२.८.२०१९ चे प्रस्ताव.
२) सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि. ६ जून, २००२

**प्रस्तावना:-**

आयुक्त समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवर श्रीमती ए.ए.श्रीगिरीवार हया सरळसेवेने दि. ६.७.१९८२ रोजी कनिष्ठ लिपिक पदावर रूजू झालेल्या आहेत. आयुक्तालयाचे दि. २६.३.१९९८च्या आदेशान्वये श्रीम. ए.ए.श्रीगिरीवार यांचे वरिष्ठ लिपिक पदावर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आलेले होते. परंतु त्यावेळी श्रीम. श्रीगिरीवार यांनी सदरची पदोन्नती नाकारली. त्यानंतरच्या कालावधीत श्रीम.श्रीगिरीवार यांचेवर विभागीय चौकशी सुरु असल्यामुळे त्यांना पदोन्नती देण्यात आलेली नाही. श्रीम. श्रीगिरीवार हया महात्मा ज्योतीबा फुले शासकीय वसतीगृह जोगेश्वरी येथे कनिष्ठ लिपिक पदावर कार्यरत असताना, मे. सोनल प्लॅस्टीक मुंबई या संस्थेने वसतीगृहाला पुरविलेल्या स्टेशनरी प्रकरणी मालाचा पुरवठा केलेला नसतानाही देंयके सादर करुन अदा केल्याबद्दल त्यांचेविरुध्द शासन ज्ञापन दि. १८.८.१९९१ अन्वये मनासे (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ८ खाली शिस्तभंगाची कार्यवाही सुरू होती. श्रीम. श्रीगिरीवार यांना सदर विभागीय चौकशी प्रकरणातून शासनाच्या दि. २१ मार्च २०१६ च्या आदेशान्वये **"दोषमुक्त"** करण्यात आलेले आहे. दरम्यान श्रीम.श्रीगिरीवार यांनी पदोन्नतीच्या अनुषंगाने मा. मॅट मुंबई येथे मुळ अर्ज क्र. १२/२०१० दाखल केला होता. त्यावर मा. न्यायालयाने दि. २५.७.२०११ रोजी पदोन्नतीच्या नियमातील अटी व शर्तीनुसार श्रीम. श्रीगिरीवार हया पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास, त्यांना दि. ४.१.२००९ पासून पदोन्नती देण्याबाबतचे आदेश दिलेले आहेत. तथापि, त्यांचे विरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीचा निकाल श्रीगिरीवार या दि. ३१.१.२०१० रोजी सेवानिवृत्त झाल्यानंतर लागल्यामुळे त्यांना सेवा कालावधीत पदोन्नती देता आलेली नाही. ही बाब विचारात घेवून श्रीमती श्रीगिरीवार यांना त्यांचेपेक्षा सेवाकनिष्ठ असलेल्या श्री. एस.टी. शिंदे यांचा पदोन्नतीने वरिष्ठ लिपिक पदावरील रूजू झाल्याचा दि. १०.१.२००८ हा दिनांक मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्रीमती ए.ए. श्रीगिरीवार, कनिष्ठ लिपीक (सेवानिवृत्त) यांना त्यांचेपेक्षा सेवाकनिष्ठ असलेले श्री. एस.टी. शिंदे यांचा वरिष्ठ लिपिक या पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्याचा दि.१०.१.२००८ हा दिनांक मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) श्रीम. ए.ए.श्रीगिरीवार यांना वरीष्ठ लिपिक या पदावरील मंजूर केलेला दि. १०.१.२००८ हा मानीव

दिनांक ते सेवानिवृत्त झालेल्याचा दिनांक ३१.१.२०१० या कालावधीतील त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करावी.

ब) श्रीम.ए.ए.श्रीगिरीवार यांना दि. १०.०१.२००८ ते त्यांच्या सेवानिवृत्तीचा दिनांक ३१.०१.२०१० या कालावधीतील वेतन व भत्त्यांची थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

२. श्रीम.ए.ए.श्रीगिरीवार, सेवानिवृत्त कनिष्ठ लिपीक यांना त्या सेवेत वरिष्ठ लिपिक पदावर प्रत्यक्ष पदोन्नती मिळालेली नव्हती. सबब श्रीम.ए.ए.श्रीगिरीवार, सेवानिवृत्त कनिष्ठ लिपीक यांना प्रस्तुत वरिष्ठ लिपिक पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्याकरिता महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ३२ मधील तरतूदी शिथिल करण्यास सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेली आहे.

३. प्रस्तुत शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे ११२४/का.१२, दि.१०.१०.२०१९ व क्र. ४७९/१९/सेवा-३, दि.१५.११.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०१९१४०६४८९१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2020.10.19 14:08:55 +05'30'

**( सं. गि. पाटील )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्रीम.ए.ए.श्रीगिरीवार, सेवानिवृत्त कनिष्ठ लिपीक (द्वारा- आयुक्त, समाज कल्याण, पुणे.)
२) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
३) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, पुणे विभाग, पुणे
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
६) निवड नस्ती/आस्था-२.